“कृषीपंप वीज जोडणी धोरण-२०२०” अंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गातील कृषीपंप अर्जदारांना उच्चदाब वितरण प्रणालीद्वारे सन-२०२२-२३ या वर्षात वीज जोडण्या देण्याकरिता निधी वितरीत करणेबाबत. (लेखाशिर्ष क्र.४८०१४०९५)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निधिवि-२०२२/उविप्र/प्र.क्र.४६/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२३.

वाचा:- १. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र: संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१२१/ऊर्जा-५, दि.१८.१२.२०२०.
२. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र: संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१२१/ऊर्जा-५, दि.१७.०३.२०२२.
३. शा.नि. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र: संकीर्ण-२०२२/प्र.क्र.१२१/ऊर्जा-५, दि.२१.०३.२०२३.

प्रस्तावना :-

दि.०१.०४.२०१८ पासून पैसे भरुन वीज जोडणीकरिता प्रलंबित असणाऱ्या कृषीपंप अर्जदारांना वीज जोडणी देण्याकरिता सर्वसमावेशक असे “कृषीपंप वीज जोडणी धोरण-२०२०” संदर्भीय शासन निर्णय क्रमांक (१) अन्वये जारी केले आहे. सदर धोरणाअंतर्गत लघुदाब वाहिनीपासून २०० मीटर अंतर असणाऱ्या कृषीपंपाना एरिअल बंच केबलद्वारे वीजपुरवठा करण्यात येत आहे. या कामाकरिता लागणारा खर्च महावितरण स्वनिधीतून करित आहे. लघुदाब वाहिनीपासून २०० मीटरपेक्षा जास्त व उच्चदाब वाहिनीपासून ६०० मीटरच्या आत असणाऱ्या कृषीपंपाना उच्चदाब वितरण प्रणालीद्वारे वीज जोडण्या देण्यात येत आहेत. या करिता लागणाऱ्या पायाभूत सुविधा उभारण्याचा खर्च शासनामार्फत दरवर्षी रु.१५०० कोटीच्या मर्यादेत भागभांडवल स्वरुपात महावितरण कंपनीस देण्यास मान्यता मिळाली आहे.

२. सदर धोरणाची अंमलबजावणी योग्य रितीने होण्याकरिता सन २०२१-२२ वर्षातील कामांकरिता दि.१७.०३.२०२२ अन्वये व सन २०२२-२३ या वर्षातील कामांकरिता दि.२१.०३.२०२३ अन्वये शासन निर्णय निर्गमित केले आहेत.

३. महावितरणच्या संकेतस्थळावरील डॅशबोर्डनुसार दि.०१.०४.२०१८ पासून दि.१५.०३.२०२३ पर्यंत ३,९७,१५० कृषीपंप वीज जोडण्या प्रलंबित असून त्यापैकी २,६४,११३ वीज जोडण्या देण्यात आल्या आहेत. प्रलंबित वीज जोडण्यांपैकी लघुदाब वाहिनीपासून २०० मीटरपेक्षा जास्त व उच्चदाब वाहिनीपासून ६०० मीटर पेक्षा कमी अंतर असणाऱ्या ८९,८८४ वीज जोडण्या दि.१५.०३.२०२३ पर्यंत प्रलंबित आहेत.

४. सन २०२१-२२ या वर्षाकरिता सदर प्रयोजनार्थ लेखाशिर्ष क्र.४८०१४०९५ अंतर्गत रु. ५०० कोटी इतकी तरतूद मंजूर होती. त्यानुसार दि.२९.०३.२०२२ च्या शासन निर्णयान्वये रु.५०० कोटी इतका निधी महावितरण कंपनीस वितरीत करण्यात आला. सदर निधी उपरोक्त प्रयोजनार्थ खर्च केल्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र महावितरण कंपनीने दि.२०.०२.२०२३ रोजी शासनास सादर केले आहे.

५. सन २०२१-२२ करिताच्या सर्वसाधारण घटकातील अर्जदारांकरिता वीज जोडणी व पायाभूत सुविधांकरिता मंजूर रु.१३५०.५९ कोटी पैकी सदर प्रयोजनार्थ खर्च केलेले रु.५०० कोटी वजा जाता उर्वरित रु.८५०.५९ कोटी महावितरण कंपनीस वितरीत करणे आवश्यक आहे. तसेच महावितरण कंपनीने मंजूर प्रकल्पाच्या प्रशासकीय मान्यतेस अनुसरून २०१ ते ६०० मीटरपेक्षा जास्त अंतर असणारे सर्वसाधारण वर्गवारीतील ३८,२१० प्रलंबित कृषीपंप अर्जदारांना उच्चदाब वितरणप्रणालीद्वारे वीजपुरवठा करण्यास रु.१२९२ कोटी इतका खर्च अपेक्षित आहे. अशाप्रकारे सन २०२१-२२ मधील उर्वरित व सन २०२२-२३ मधील प्रलंबित अर्जदारांना उच्चदाब वितरण प्रणालीद्वारे वीजपुरवठा करण्यास एकूण रु.२१४३ कोटी इतक्या रक्कमेची आवश्यकता आहे.

६. सन २०२३ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात सन २०२२-२३ या वर्षाकरिता लेखाशिर्ष क्र.४८०१४०९५ अंतर्गत रु.१२०० कोटी इतकी सुधारित तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. वित्त विभागाने सदर सुधारित तरतुदीपैकी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता रु.३४९.४१ कोटी इतका निधी महावितरण कंपनीस वितरीत करण्यास सहमती दर्शविली आहे. त्याअनुषंगाने लेखाशिर्ष क्र.४८०१४०९५ अंतर्गत रु.३४९.४१ कोटी इतका निधी महावितरण कंपनीस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत.

**शासन निर्णय :-**

(१) “कृषीपंप वीज जोडणी धोरण-२०२०” योजनेअंतर्गत सन २०२१-२२ मंजूर प्रकल्पातील सर्वसाधारण प्रवर्गातील २०१ मिटर ते ६०० मिटर अंतरातील प्रलंबित अर्जदारांना उच्चदाब वितरण प्रणालीद्वारे वीज जोडण्या देण्याकरिता रु.३४९,४१,००,०००/- (रुपये तीनशे एकोणपन्नास कोटी एक्केचाळीस लाख फक्त) इतका निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(२) या निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेली अनुदानाची रक्कम ज्या उद्देशासाठी मंजूर करण्यात आली आहे त्याच उद्देशासाठी ती उपयोगात आणली जाईल याची जबाबदारी महावितरण कंपनीची राहिल.

(३) सदर खर्च मागणी क्र.के-११ खाली ४८०१ वीज प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०५ महापारेषण व वितरण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (०१) भांडवली गुंतवणुक, (०१)(०१) महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनीमध्ये भांडवली गुंतवणूक (महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीमध्ये भांडवली गुंतवणूक) (कार्यक्रम) ५४ गुंतवणूका लेखाशिर्ष क्र.४८०१४०९५ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

(४) सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.ना.रा.ढाणे, अवर सचिव (ऊर्जा-३) व श्री.ना.श्री.कराड, नियंत्रण अधिकारी म्हणून उप सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रु.३४९,४१,००,०००/- (रुपये तीनशे एकोणपन्नास कोटी एक्केचाळीस लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी,

मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

(५) शासनाने महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या. या कंपनीमध्ये केलेली सदर भांडवली गुंतवणूक ही महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी मर्या. मार्फत केलेली भांडवली गुंतवणूक समजण्यात यावी. महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या. या कंपनीने सदर रक्कमेच्या दर्शनी मूल्याइतके समभाग महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी मर्या. या कंपनीच्या नावे वितरित करावेत.

(६) या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.१६.०३.२०२३ च्या परिपत्रकातील सर्व अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

(७) सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९४/२०२३ /व्यय-१६, दि.३०.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमती नुसार व मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३३१११३२२९८११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786,
pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB,
serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2023.04.10 15:52:05 +05'30'

**(प्र. पुं. बडगेरी)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई-३२.
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
७. अपर मुख्य सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई-३२.
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१०. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.

१५.अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६.अवर सचिव, (अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१७.कक्ष अधिकारी (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
१८.कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९.निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०.ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.